प्रधानमंत्री-जनजाती आदिवासी न्याय महाअभियान (PM-JANMAN) अंतर्गत आदिम जमातीतील पात्र लोकवस्त्या प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेच्या धर्तीवर बारमाही रस्त्यांनी जोडण्याबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः पीएमज-२०२४/प्र.क्र. २५ /बांध-२**
**मंत्रालय, बांधकाम भवन, २५, मर्झबान रोड,**
**फोर्ट, मुंबई - ४०० ००१.**
**दिनांक : २९ जुलै, २०२४.**

**वाचा :-**

१) ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार यांचे DO.NoP-17025/26/2023-RC-Part (I), दिनांक ०७/१२/२०२३ रोजीचे पत्र.

२) ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार यांचे क्र. No.P-17025/26/2023-RC-Part (I) (FMS No.386625), दिनांक ०८.१२.२०२३ रोजीचे पत्र.

३) ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार यांचे DO.NoP-17025/26/2023-RC-Part (I), दिनांक १०.१२.२०२३ रोजीचे पत्र.

४) जनजातीय कार्य मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.No.16013/11/2023-TRI, दिनांक ०६.१२.२०२३

५) केंद्रीय ग्रामीण विकास मंत्रालयाने नवी दिल्ली येथे आयोजित केलेल्या दिनांक १५ डिसेंबर, २०२३ रोजीच्या बैठकीचे इतिवृत्त.

६) जनजातीय कार्य मंत्रालय, भारत सरकार यांचे पत्र क्र.No.16013/11/2023-TRI, दिनांक २१.१२.२०२३

७) ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार यांचे क्र. No P-17025/26/2023-RC-Part (I) (eFMS 386804), दिनांक २८.१२.२०२३ रोजीचे पत्र

८) ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार यांचे क्र. File No.P-17025/26/2023-RC-Part (I) (FMS No.386625), दिनांक २९.१२.२०२३ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

केंद्र शासनाने जनजातीय गौरव दिनानिमित्त दिनांक १५/११/२०२३ रोजी देशात प्रधानमंत्री-जनजाती आदिवासी न्याय महाअभियान (PM-JANMAN) राबविण्याचा निर्णय घेतला आहे. या महाअभियानाचा देशातील ७५ विशेषत: असुरक्षित आदिवासी गटांचा PVTGs (Particularly Vulnerable Tribal Groups) विकास करणे हा मुख्य उद्देश आहे. केंद्र शासनाने या महाअभियानांतर्गत ११ विशेष बाबींवर लक्ष केंद्रीत केले आहे. प्रधानमंत्री जनजाती आदिवासी न्याय महाअभियान (PM-JANMAN) अंतर्गत महाराष्ट्रातील आदिम जमातीतील (कोलाम, कातकरी/काथोडी व माडीया गोंड) पात्र लोकवस्त्या रस्त्यांनी जोडण्यात येणार असून सदर योजना केंद्र शासनाची महत्वकांक्षी योजना आहे. प्रधानमंत्री जनजाती आदिवासी न्याय महाअभियान (PM- JANMAN)

या योजनेची अंमलबजावणी करण्यासाठी राष्ट्रीय ग्रामीण अवसंरचना विकास एजेंसी (NRIDA), नवी दिल्ली यांना नोडल म्हणून जाहीर करण्यात आले आहे. सदर योजनेचे अंतिम उद्दीष्ट निश्चित करणे व निधीच्या पूर्ततेबाबतची कार्यवाही करणेबाबत केंद्रीय ग्रामीण विकास मंत्रालय, नवी दिल्ली यांच्या दिनांक २९.१२.२०२३ रोजीच्या पत्रासोबतच्या दिनांक १५.१२.२०२३ रोजीच्या इतिवृतान्वये सूचना निर्गमित करण्यात आलेल्या आहेत. त्यानुसार राज्यात प्रधानमंत्री जनजाती आदिवासी न्याय महाअभियान (PM-JANMAN) राबविण्याबाबतची बाब राज्य शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

राज्यात केंद्र पुरस्कृत प्रधानमंत्री-जनजाती आदिवासी न्याय महाअभियान (**PM-JANMAN**) अंतर्गत आदिम जमातीतील (कोलाम, कातकरी/काथोडी व माडिया गोंड) पात्र लोकवस्त्यांना प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेच्या धर्तीवर बारमाही रस्त्यांनी जोडण्याबाबतचा निर्णय शासनाने घेतला आहे.

२. सदर योजना प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेच्या धर्तीवर राबविण्यात येईल.

३. सदर योजनेच्या निधीमध्ये केंद्र हिस्सा ६० % व राज्य हिस्सा ४० % असेल.

४. प्रधानमंत्री जनजाती आदिवासी न्याय महाअभियान (PM-JANMAN) ही केंद्र पुरस्कृत योजना आहे. सदर योजनेअंतर्गत केंद्रीय आदिवासी विकास मंत्रालय (MoTA), भारत सरकार यांचेकडून राज्यासाठी १००+ लोकसंख्या असलेल्या लोकवस्त्यांची माहिती उपलब्ध करून देण्यात आल्यानंतर यानुषंगाने केंद्र शासन उद्दिष्ट ठरविणार आहे. त्याअनुषंगाने प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेच्या धर्तीवर सदर योजनेची अंमलबजावणी करण्यात येईल.

५. प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेच्या मार्गदर्शक सूचना या योजनेस लागू राहतील. तसेच संदर्भाधीन क्र.८ येथील दिनांक २९.१२.२०२३ रोजीच्या पत्रान्वये केंद्र शासनाने दिलेल्या सूचनेनुसार या योजनेची अंमलबजावणी करण्यात येईल.

६. सदर योजनेकरिता केंद्र शासनाने विहीत केलेल्या प्रति किलोमीटर मापदंडापेक्षा (Cost Norm) अधिक रक्कम असल्यास ती राज्य शासनाच्या हिश्या मधून देण्यात येईल.

७. सदर योजनेच्या प्रशासकीय खर्चासाठीच्या निधीकरीता केंद्र हिस्सा (६० %) व राज्य हिस्सा (४० %) करीता दोन नवीन लेखाशिर्ष उघडण्यात येतील.

८. प्रधानमंत्री जनजाती आदिवासी न्याय महाअभियान (PM-JANMAN) अंतर्गत रस्त्यावरील Traffic Survey च्या आधारावरच रस्त्याचे डिझाईन PMGSY च्या नियमावलीनुसार IRC च्या मानकाप्रमाणे करण्यात येईल व त्याप्रमाणे रस्त्याची रूंदी निश्चित करण्यात येईल.

९. प्रधानमंत्री ग्रामसडक योजनेच्या Vision Document नुसार सदर कामावर नवीन तंत्रज्ञानाचा समावेश करण्यात येईल.

१०. सदर योजनेचा मासिक भौतिक व आर्थिक प्रगती अहवाल मुख्य अभियंता, प्रमंग्रासयो, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे यांनी शासनास दरमहा सादर करावा.

११. सदर शासन निर्णय आदिवासी विकास विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.०४/का.०५, दिनांक २१.०२.२०२४, नियोजन विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.९०/१४४४, दिनांक २३.०२.२०२४ व वित्त विभागाचा अनौपचारीक संदर्भ क्र.१७३/२०२४/व्यय-१५, दिनांक २६.०२.२०२४ अन्वये देण्यात आलेल्या मान्यतेनुसार निर्गमित करण्यात येत आहे.

१२. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संकेताक २०२४०७२९१४१२४९४५२० असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

PRASHANT VINAYAKRAO PATIL

Digitally signed by PRASHANT VINAYAKRAO PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=RURAL DEVELOPMENT DEPARTMENT, 2.5.4.20=2b1bad66664b1e11e3bf66db1d526143e814db5f8c505422af66a5628314537e, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=9524CAB2D5A858B4A01FF72F5CAE5FDDC4F8C964F3AFC6B6249294AD88EC870D, cn=PRASHANT VINAYAKRAO PATIL
Date: 2024.07.29 17:41:33 +05'30'

(प्रशांत पाटील)
उप सचिव, ग्राम विकास विभाग

प्रत,

१. मा.राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.खासदार (सर्व), महाराष्ट्र राज्य.
४. मा.मंत्री, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. मा.विरोधी पक्षनेता, विधानसभा/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
६. सर्व विधानसभा सदस्य/विधानपरिषद, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, मुंबई.
७. मा.मुख्य सचिव यांचे उप सचिव, मंत्रालय, मुंबई.
८. सह सचिव, ग्रामीण विकास मंत्रालय, भारत सरकार, नवी दिल्ली.
९. अपर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०. प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई.
११. प्रधान सचिव, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मंत्रालय, मुंबई.
१२.सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. सचिव, मुमंग्रासयो, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मंत्रालय, मुंबई.
१४. आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
१५. महालेखापाल, (लेखा परिक्षा) व (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.

१६.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)

१७.मुख्य अभियंता, प्रमंग्रासयो, महाराष्ट्र ग्रामीण रस्ते विकास संस्था, पुणे.

१८. वित्तीय नियंत्रक, प्रमंग्रासयो, ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन, मंत्रालय, मुंबई.

१९. अधीक्षक अभियंता, प्रमंग्रासयो, सर्व.

२०. उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

२१. कार्यकारी अभियंता, प्रमंग्रासयो, सर्व.

२२. कक्ष अधिकारी, बांध-१, ग्राम विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.

२३. निवड नस्ती (बांधकाम-२)